विद्यानिकेतन शाळा चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन ज्ञापन क्रमांक :- विभशा-२०१४/ प्र.क्र.१९९/ विजाभज-२,**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरुचौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १६ मार्च, २०१५.

वाचा :- १. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज २०१४ /प्र.क्र.११०/ अर्थ-३, दि.१ जुलै,२०१४.
२. शासन ज्ञापन क्र. विभशा-२०१४/प्र.क्र.१९९/विजाभज-२, दि. २६.०८.२०१४
३. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०९.०२.२०१५
४. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र, पुणे यांचे पत्र क्र. विजाभजसं/विद्याआशा/वेतनेत्तर तरतुदी खर्च/परवानगी/१४-१५/३२४, दि. १८.०२.२०१५

**ज्ञापन: -**

संदर्भाधीन परिपत्रकान्वये वित्त विभागाने सर्व मंत्रालयीन विभागांना महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१४ च्या अनुषंगाने वित्तीय वर्ष २०१४-१५ च्या अर्थसंकल्पीत तरतुदीच्या विनियोगाबाबत सूचना दिलेल्या आहेत.

२. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात मागणी क्र.एन.३, मुख्य लेखाशिर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण (०६) विद्यानिकेतन (०६) (०१) विद्यानिकेतन शाळा चालविण्यासाठी सहायक अनुदाने २२२५-२६०२, ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली एकूण रु. ६५०० हजार (रुपये पासष्ट लक्ष) इतक्या अर्थसंकल्पीत तरतूदी पैकी ६०% रु. ३९०० हजार (रु. एकोणचाळीस लक्ष) इतकी रक्कम वितरीत करण्यात आलेली आहे.

३. आता वित्त विभागाने दि. ९ फेब्रुवारी, २०१५ च्या परिपत्रकान्वये एकूण तरतुदीच्या ८५% निधी ( रु. ५५२५ हजार ) वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. म्हणजेच यापूर्वी वितरीत केलेला ६०% (रु. ३९०० हजार ) वजा जाता उर्वरित रु. १६२५ हजार इतका निधी झालेल्या खर्चाचा समावेश करण्याच्या अटीवर विद्यानिकेतन शाळा चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदाने खालील अटीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन या ज्ञापनान्वये मंजुरी देत आहे.

१) वरील निधी खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय अधिकार नियम, शासन निर्णय, परिपत्रके, केंद्रीय दक्षता अयोगांची मार्गदर्शक तत्वे व महालेखापाल कार्यालयाने उपस्थित केलेले मुद्दे याबाबतच्या सर्व अटींचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्यांची राहील.

२) निधी अखर्चीत असल्यास त्याचे ताळमेळ घालून व लेखा परिक्षण करुन सदर निधी जर खर्च करावयाचा नसल्यास शासनाच्या लेख्यामध्ये परत करण्यात यावा.

३) निधी वितरीत करताना मासिक निधी विविरण पत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात.

४. हे ज्ञापन वित्त विभाग यांच्या शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०९.०२.२०१५ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

सदरहु ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०१५०३१६१५४२१४४७२२ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Wilson Ghosal Fernandis

Digitally signed by Wilson Ghosal Fernandis
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=401209, st=Maharashtra, cn=Wilson Ghosal Fernandis
Date: 2015.03.16 15:53:11 +05'30'

**( वि. घो. फर्नांडिस )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) संचालक,विमुक्त जाती,भटक्या जमाती,इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
२) आयुक्त,समाज कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
३) सर्व प्रादेशिक उपायुक्त,समाज कल्याण विभाग,
४) सर्व सहायक आयुक्त,समाजकल्याण विभाग,
५) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७) नियोजन विभाग (कार्या-१४-१३), मंत्रालय मुंबई
८) वित्त विभाग (कार्या-व्यय -१४) मंत्रालय मुंबई
९) कक्ष अधिकारी, (कार्या. अर्थसंकल्प) सा.न्या. व वि. स.वि., मंत्रालय, मुंबई
१०) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई
११) लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा मुंबई
१२) मा.मंत्री (सा.न्या.)यांचे खाजगी सचिव
१३) मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
१४) सचिव,सामाजिक न्याय यांचे स्वीय सहायक
१५) निवडनस्ती.